राज्य युवा विकास निधीची स्थापना
सन २०१६-१७ या वर्षाकरीता निधी
वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निवियो-२०१६/प्र.क्र ६५ /क्रीयुसे-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २३ जानेवारी, २०१७

**वाचा :** १) शासन निर्णय क्रमांक : युकधो-२०१२/प्र.क्र.४३/क्रीयुसे-३, दि. १४ जून, २०१२
२) शासन निर्णय क्रमांक :युकयो-१६१३/प्र.क्र.६६/क्रीयुसे-३, दि. १९ डिसेंबर, २०१३
३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.९८/अर्थसं-३, दि. २० एप्रिल, २०१६
४) क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र. निधी वितरण/योजना/५५७१/२०१६-१७/का-१०/२४९९ दि. ०३ ऑगस्ट, २०१६

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य युवा धोरण -२०१२ मध्ये याबाबत सर्वकष विचार करण्यात येऊन युवकांना व युवा क्षेत्रात काम करणाऱ्या संस्थाना युवक कल्याण विषयक उपक्रमांना सहाय्य करण्यासाठी राज्य युवा विकास निधीची स्थापना करण्यात आली त्यानुसार शासन निर्णय क्रमांक युकधो-१६१३/प्र.क्र.६६/क्रीयुसे-३ दि. १९ डिसेंबर, २०१३ अन्वये राज्यातील युवांना सक्षम करण्यासाठी विविध युवक कल्याण विषयक उपक्रमांना सहाय्य करण्याकरीता तसेच राज्यात युवा विकासाचे उपक्रम परिणामकारकरित्या राबविण्यासाठी व राज्यातील उदयोन्मुख युवांना उज्वल भविष्याच्या वृध्दिगंत करण्यासाठी त्यांना प्रोत्साहन व आर्थिक सहाय्य देण्याची गरज लक्षात घेऊन राज्य युवा विकास निधीची स्थापना करण्यास खालील अटी व शर्तीस अधिन राहून शासन मान्यता देण्यात आली आहे. सदर उपक्रमाकरीता सन २०१५-१६ मध्ये रू.२४.५० लक्ष अर्थसंकल्पित झाला आहे. सन २०१६-१७ या कालावधीत प्रस्तृत योजनेची अमलबजावणी करीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रू ३५.०० लक्ष इतक्या तरतूदीपैकी ८० टक्केच्या मर्यादेत रू. २८.०० लक्ष इतक्या निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :

राज्यातील उदयोन्मुख युवांना उज्वल भविष्याच्या संधी वृध्दीगत करण्यासाठी त्यांना प्रोत्साहन व आर्थिक सहाय्य देण्यासाठी राज्य युवा विकास निधीची स्थापना करण्यात आली. यासाठी नमूद विहित केलेल्या तरतूदीनुसार रू. ३५.०० लक्ष ऐवढा निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयानुसार रू. २८.०० लक्ष तरतूद वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

उपरोक्त होणार खर्च मागणी क्र. ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा, (००)१०३ विद्यार्थीतर कल्याण कार्यक्रम, (११) राज्य युवा विकास निधी, (११)(०१) राज्य युवा विकास निधीला अनुदान (२२०४-५६७१)-३१ सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे. त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि. २०/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१. वित्त विभागाच्या दि. २०/०४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

३.४. दि. २४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

३.५. परिपत्रकातील “अ” व “ब” ची पूर्तता होत आहे.

४. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २०/०४/२०१६ व दि. २४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबातची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अंटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७ व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२३१५५७१०९२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.01.23 15:58:19 +05'30'

(कि.ल.संखे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. वित्त विभाग (व्यय-५) मंत्रालय, मुंबई.
७. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, (संचालयामार्फत)
८. निवडनस्ती, क्रीयुसे-३.